## मी आहे

# हेलन केलर



लेखक-ब्रॅड मेल्टझर चित्रे-ख्रिस्तोफर एलियोपोलस

मराठी अनुवाद- सानिया

मी जेव्हा लहान होते तेव्हा अगदी तुमच्यासारखीच होते.

मला खेळायला आवडायचं.

माझा कुत्रा मला आवडायचा.

आणि मला रंगीबेरंगी फुलं बघायला आवडायची.

मला इतरांची नक्कल करायलाही आवडायचं. सहा महिन्यांची असताना मी भरपूर बडबड करायचे.



एका वर्षाची झाल्यावर मी चालायला लागले.

माझा अजून एक आवडता शब्द म्हणजे "वा वा"




मी अगदी इतर मुलांसारखीच होते. हो ना?

पण अशी एक घटना घडली की ज्यामुळे माझं आयुष्य पार बदलून गेलं.

मी एकोणीस महिन्यांची असताना प्रचंड आजारी पडले.

डॉक्टरांनी देखील माझ्या जगण्याची आशा सोडली.

मी जगले पण त्या आजारपणाने मला कायमसाठी आंधळं आणि बहिरं बनवलं.

मला दिसणारं जग असं होतं.

डोळे घट्ट मिटा आणि कानांमध्ये बोटं घाला.

मी काही बघू शकत नव्हते.

ऐकूही शकत नव्हते.

हो.

*काहीच नाही.*

मला माहीत आहे की हे वाचून तुम्ही घाबरून गेला असाल.

मला सुद्धा खूप भीती वाटायची.

त्या काळी बहिऱ्या आणि आंधळ्या लोकांशी कसं वागायचं हे कुणाला माहितीच नव्हतं.

माझ्या नातेवाईकांना तर मी राक्षस वाटायचे.




त्याचं म्हणणं बरोबर होतं. माझं वागणं शिष्टाचारांना धरून नव्हतं. मी प्रचंड वैतागून गेले होते. माझ्या अंधाऱ्या जगात माझ्याविषयी आपुलकी असणारं कोणी होतं हेच मला ठाऊक नव्हतं.

मी काय करतीये ते मला दिसत नव्हतं. ऐकूही येत नव्हतं.

पण मी पाच वर्षांची होईपर्यंत मी संभाषणासाठी काही छोट्या छोट्या युक्त्या शोधून काढल्या होत्या.
‘हो’ म्हणण्यासाठी मी डोकं वर खाली हलवायचे.
‘नाही’ म्हणण्यासाठी मान उजवीकडून डावीकडे हलवायचे.

‘बाबा’ म्हणण्यासाठी मी चष्मा घालण्याची नक्कल करायचे.



‘आई’ साठी मी गालावर हात ठेवायचे.



लहान बहिणीसाठीची खुण अशी होती...



आणि मी जेव्हा थंडीने कुडकुडण्याची नक्कल करायचे तेव्हा आईला लगेच समजायचं...



पण अजूनसुद्‌धा मी बेलेला-माझ्या लाडक्या कुत्र्याला खुणेने खेळायला बोलवू शकत नव्हते. मला बोलायचं कसं हेच ठाऊक नव्हतं. त्यामुळे मी तिला हाक मारू शकत नव्हते. मला तिच्यासोबत खेळायचं होतं.




सर्वात वाईट गोष्ट म्हणजे मला आता या अंधाऱ्या जगाची सवय होत चालली होती आणि मी एकलकोंडी बनत गेले.

लोकांनी माझ्या आई बाबांना माझ्याबद्दल आशा सोडून द्यायला सांगितली. त्यांच्या मते मी आयुष्यात काहीच चांगलं करू शकणार नव्हते.

माझ्या आईबाबांनी मात्र अशा लोकांचं म्हणणं कधीच ऐकलं नाही.

त्यांचे प्रयत्न चालूच राहिले. शोधता शोधता त्यांना अजून एका आंधळ्या आणि बहिऱ्या मुलीबद्दल माहिती वाचायला मिळाली. ते वाचून माझ्या आजारपणानंतर पहिल्यांदाच त्यांच्या मनाला उभारी मिळाली.




आपल्या सगळ्यांनाच शिक्षकाची गरज असते.

पण त्यावेळी मात्र मला आयुष्यात पुढे काय वाढून ठेवलंय याची काहीच कल्पना नव्हती.

तो माझ्या आयुष्यातला सर्वात महत्वाचा दिवस होता.

मी तेव्हा सहा वर्षांची असेन.

आईची धावपळ पाहून आज कुठलीतरी मोठी गोष्ट घडणार आहे याची चाहूल मला लागलीच होती.

मी सकाळचं ऊन खात व्हरांड्यात वाट बघत बसले.



तेवढ्यात कोणीतरी आलं. पायऱ्यांवरची पावलं मला जाणवली.

समोरची व्यक्ती माझी आईच आहे असं समजून मी पुढे झाले.

आणि तिने मला मिठीत घेतलं.





तिचं नाव होतं ॲन सुलिवान.
हिच ती माझी शिक्षिका जिच्यामुळे
माझं पूर्ण आयुष्यच बदलून गेलं.

शिकवणी सुरु झाल्यावर काहीच दिवसात तिने मला एक बाहुली दिली.

तिने मला थोडावेळ बाहुलीसोबत खेळू दिलं आणि मग *बा-हु-ली* ही अक्षरं माझ्या तळहातावर गिरवली.




मला तो स्पर्श जाणवत होता.

पण अक्षरं किंवा शब्द म्हणजे काय असतं हेच मला माहीत नव्हतं.

पण मिस सुलिवान तेवढ्यावरच थांबली नाही.

एके दिवशी ती मला ‘पेला’ आणि पाणी हे शब्द शिकवत असताना आमचं मोठं भांडण झालं.

माझा पारा इतका चढला की मी माझी नवीन बाहुली उचलली आणि रागाने भिरकावून दिली.

तेव्हा माझी जरा जास्तच चिडचिड व्हायची.



माझ्यासाठी ते सगळंच खूप अवघड होतं.

मी वैतागून गेले होते.

मिस सुलिवानने चिवटपणे प्रयत्न चालूच ठेवले. एके दिवशी ती मला बाहेर मोकळ्या हवेत घेऊन गेली.

आम्ही एका हातपंपाजवळ आलो. तिने माझा एक हात वाहत्या पाण्याखाली धरला.

आणि दुसऱ्या हातावर बोटांनी अक्षरं गिरवली *पा-णी*





तिने पुन्हा एकदा अक्षरं गिरवली.
*पा-णी*
W-A-T-E-R.
परत एकदा
W-A-T-E-R.
पुन्हा
W-A-T-E-R.
पुन्हा
W-A-T-E-R.
आणि पुन्हा
W-A-T-E-R.
W-A-T-E-R.
W-A-T-E-R.
W-A-T-E-R.
W-A-T-E-R.
तुला समजतंय. हो ना?
हो! मला समजलं होतं.

तेव्हापासून माझ्या लक्षात आलं की प्रत्येक गोष्टीला एक विशिष्ट नाव असतं. आता मी स्पर्श केलेली प्रत्येक वस्तू मला वेगळीच भासू लागली. स्पर्श केल्यासरशी ती वस्तू जिवंत होऊन मला तिची ओळख सांगू लागली.




हळूहळू मीही टीचरच्या हातावर अक्षरं गिरवू लागले. अखेर, मला समजू शकेल अशी व्यक्ती मला मिळाली होती.

कुठलीही नवीन गोष्ट शिकणं जरा कठीणच असतं.

मी शब्द शिकायला सुरुवात केली.

माझा शब्दसाठा भराभर वाढू लागला.

असंच एका दिवशी मी '*प्रेम*' ह्या शब्दाचा अर्थ शिकले.

मी माझ्या टीचरला काही फुलं दिली. लगेच तिची बोटं माझ्या तळहातावर फिरू लागली...




"जे इथे जाणवतं ते म्हणजे प्रेम," माझ्या हृदयावर हात ठेवत तिने अक्षरं गिरवली.

माझ्या गोंधळात आणखीनच भर पडली.

जिला आपण स्पर्श करून बघू शकत नाही अशी संकल्पना समजणं किती अवघड आहे ना?



माझ्या डोक्यात काहीच शिरत नव्हतं.

टीचर मला सरळ सरळ *प्रेम* नावाची वस्तू दाखवून का टाकत नाही? मी विचार केला.

पण मग तिने हळूहळू समजावायला सुरुवात केली....



त्या क्षणापासून माझं जगच बदलून गेलं.
मला माझ्या कुटुंबियांशी बांधून ठेवणारे आपुलकीचे अदृश्य धागे मला लख्ख दिसू लागले.
डोळे बंद करा...
आई-बाबा आणि मित्र-मैत्रिणींशी जोडून ठेवणारे हे प्रेमाचे बंध तुम्हालाही जाणवतील.



माझं आयुष्य खूपच खडतर होतं.

दृष्टी नसल्यामुळे मला लोकांना बघता येत नव्हतं.

कान नसल्यामुळे त्यांचे आवाज ऐकता येत नव्हते.

पण एका नवीन कौशल्याने मला लवकरच ह्यावर मात करायला शिकवलं. तेच कौशल्य जे तुम्ही आता वापरत आहात.

वाचन.



सराव करताना मी प्रत्येक वस्तूवर तिचं नाव चिटकवायचे आणि मग त्यापासून वाक्य बनवायचे.

लवकरच हा माझा आवडता खेळ बनला.

आम्ही तासन् तास त्यात रमून जायचो.

बघा बरं तुम्हाला हे वाक्य सापडतंय का –

*मुलगी कपाटात आहे.*



त्यानंतर मी खरीखुरी पुस्तकं वाचायला सुरुवात केली.
अगदी तुमच्यासारखीच.
फरक इतकाच की माझी पुस्तकं *ब्रेल लिपी* मधे असायची.
ब्रेल ही एक अशी लिपी आहे ज्यात कागदावर उचललेल्या टिंबांना स्पर्श करून तुम्ही ती वाचू शकता.

सुरुवातीला ब्रेल वाचताना सगळे उंचवटे सारखेच भासतात.
पण मग हळूहळू सवय होत जाते.



इथे मी टिंबांनी माझं नाव लिहिलंय – हेलन (H-E-L-E-N).

ही बघा ब्रेल लिपीमधली सगळी मुळाक्षरे



वाचताना अजून मजा यावी म्हणून माझी टीचर मला बाहेर घेऊन जाई.
तिला माहिती होतं मला ऊबदार सूर्यप्रकाश आणि कोवळ्या गवताचा वास किती आवडतो ते!
मी माझी पुस्तकं इतक्यांदा पुन्हा पुन्हा वाचली की पानांवरची उचललेली टिंबं पार बुजून गेली.

मी *अरेबियन नाईट्स, रॉबिन्सन क्रूसो* आणि अशी अनेक पुस्तकं वाचली. माझं सर्वात आवडतं पुस्तक होतं *लिटिल विमेन.* पुस्तकांमध्ये मी ऐकू व बघू शकणाऱ्या धाडसी मुलामुलींना भेटायचे.






मी नऊ वर्षांची झाले तेव्हा मी बोलणं शिकायची इच्छा व्यक्त केली.

हे ऐकून मिस सुलिवानला थोडी काळजी वाटली. माझ्यावर जास्त ताण पडेल अशी भीती तिला वाटत होती. मी मात्र हार मानायला तयार नव्हते.

मग मिस सुलिवान मला सारा फुलर नावाच्या टीचर कडे घेऊन गेली. मिस फुलरने मला तिच्या तोंडात हात घालायला सांगितला आणि ती बोलत असताना तिच्या जिभेच्या आणि ओठांच्या होणाऱ्या हालचाली अनुभवायला सांगितल्या.




तासाभरात मी *म, प, अ, स, ट* आणि *इ* हे उच्चार शिकून घेतले.



आता मी माझ्या कुत्रीला हाक मारू शकत होते. आणि ती ही माझ्या हाकेसरशी लगेच मला येऊन बिलगायची.

सातव्या शिकवणीच्या वेळी मी एक पूर्ण वाक्य बोलायला शिकले.

हे वाक्य माझ्यासाठी खूपच महत्वपूर्ण होतं.



मोठी झाल्यावर मी फक्त इंग्लिशच बोलायला शिकले नाही.

तर फ्रेंच आणि जर्मनही शिकले.

उच्च शिक्षण घेण्यासाठी मला रॅडक्लिफमधल्या हॉर्वर्ड विद्यापीठात जायचं होतं.




हार्वर्ड मधे बरीचशी पाठ्यपुस्तकं ब्रेल मध्ये उपलब्ध नव्हती.

अशावेळी मिस सुलिवान पुस्तकातला मजकूर माझ्या हातावर अक्षरं गिरवून समजावून सांगी.

मला माझा अभ्यास प्रचंड आवडत होता.

मिस सुलिवानचा संयम खरंच वाखाणण्याजोगा होता.

विद्यापीठाची पदवी मिळवणारी मी पहिली आंधळी आणि बहिरी व्यक्ती होते.
मी पहिली जरूर होते पण शेवटची नाही.
मोठी झाल्यावर मी बारा पुस्तकं लिहिली आणि चौतीस देशांना भेटी दिल्या.
पण सर्वात महत्वाचं म्हणजे मला जसं शिक्षण मिळालं तसं माझ्यासारख्या इतर विकलांग व्यक्तींनाही मिळावं यासाठी मी काम केलं.



ही तर फक्त सुरुवात होती.

मी फक्त अंध आणि बहिऱ्या व्यक्तींसाठी काम करून थांबले नाही.

आता मी सामाजिक बदलांसाठी लढा द्यायला सुरुवात केली. स्त्रियांना मतदानाचा हक्क मिळावा, गरिबांना रोजीरोटी मिळावी आणि गरजूंना सुविधा मिळाव्यात यासाठीही मी काम केलं.




*अमेरिकन फाउंडेशन फॉर द ब्लाइंड* आणि *हेलन केलर इंटरनॅशनल* मार्फत अंध व्यक्ती आणि गरीबांसाठीचे काम आजतागायत चालू आहे.

लोक म्हणायचे की मी ‘वेगळी’ आहे.

मी कधीच सर्वसामान्य आयुष्य जगू शकणार नाही.

पण खरंच, ‘सर्वसामान्य आयुष्य’ असं काही असतं का?

प्रत्येक जण फुलासारखा आहे ज्याला पाण्याची आणि मायेची गरज असते.

प्रत्येकामध्ये असंख्य गुण आणि क्षमता आहेत.

आणि प्रत्येकच जण अडचणींवर मात करू शकतो.



माझ्याकडे बघा.

मी काय सांगतीये ऐका.

मी माझ्या डोळ्यांनी बघू शकत नाही पण तरीही मला दृष्टी आहे.

मी ऐकू शकत नाही पण मला स्वतःचा आवाज आहे.






अशी कल्पना करा की आयुष्य म्हणजे एक पर्वत आहे जो तुम्हाला सर करायचाय.

शिखरावर पोहोचण्याचा एकच योग्य रस्ता नाही.

आपण प्रत्येक जण चुकत माकत आपापली वाट शोधतोच.




कधी तुमचा पाय घसरेल...तुम्ही धडपडाल....

कदाचित गडगडत खालीसुद्‌धा याल...

पण जर तुम्ही पुन्हा उठलात आणि चढत राहिलात तर मी खात्रीपूर्वक सांगते...

....तुम्ही शिखर नक्कीच सर कराल.

तुम्हाला कुणीच थोपवू शकत नाही.

आयुष्य फुलवणं आपल्या हातात आहे.

संकटं तर नेहमीच असतील.

पण त्याच बरोबर संकटांवर मात करण्याचे मार्गही असतील.



मी आहे हेलन केलर.

मला कुणीच थोपवू शकत नाही.








***"जगातल्या सर्वात सुंदर गोष्टी बघितल्या जाऊ शकत नाहीत किंवा स्पर्श केल्या जाऊ शकत नाहीत त्या केवळ खोलवर हृदयात जाणवतात."* – हेलन केलर**

**जीवन क्रम** Timeline

| जून 27, 1880 | फेब्रुवारी, 1882 | मार्च 3, 1887 | एप्रिल 5, 1887 | 1889 |
|---|---|---|---|---|
| JUNE 27, 1880 | FEBRUARY 1882 | MARCH 3, 1887 | APRIL 5, 1887 | 1889 |
| टस्कंबिया, अलाबामा येथे जन्म | गंभीर आजारपणानंतर आंधळेपण आणि बहिरेपण | ॲन सुलिवान हेलनची शिक्षिका म्हणून रुजू | हेलनने पहला शब्द पाणी (WATER) गिरवला | पर्किन्स इन्स्टिट्यूट फॉर द ब्लाइंड, मॅसाच्युसेट्स मधे शिक्षणाची सुरुवात |



८ वर्षांची
चिमुकली हेलन
अॅन सुलिव्हान
सोबत



हेलन आपल्या लाडक्या कुत्रीसोबत



एलेनॉर रुझवेल्ट
बरोबर संवाद
साधताना हेलन

1890 — सारा फुलर सोबत बोलण्याचे धडे

1903 — *"द स्टोरी ऑफ माय लाइफ" आत्मचरित्र प्रकाशित*

1904 — हार्वर्ड यूनिवर्सिटी मधून पदवी प्राप्त

1924 — *अमेरिकन फाउंडेशन फॉर द ब्लाइंड सोबत कामाला सुरुवात*

ऑक्टोबर 20, 1936 / OCTOBER 20, 1936 — अॅन सुलिव्हान चा मृत्यू

सप्टेंबर 1964 / SEPTEMBER 1964 — *प्रेसिडेंशियल मेडल ऑफ फ्रिडम ने सन्मानित*

जून 1, 1968 / JUNE 1, 1968 — कनेक्टिकट मधे मृत्यू

# मी आहे हेलन केलर



मला कुणीच थोपवू शकत नाही!